**राज्यातील लघुयंत्रमाग धारकांकरीता**
GR-200407291138430001-1100 **प्रोत्साहन योजना.**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्रमांक आयडीएल-१००४/प्र.क्र. ९७ /उद्योग-८,**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**

**दिनांक : २५ मे, २००४**

वाचा : १) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्र.आयडीएल १०२१ / सीआर - ७३/उ-८, दि.३१.३.२००१

२) शासन निर्णय सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक यंत्रमाग-१०२००३/प्र.क्र.१५२/टेक्स-३, दि.११.२.२००४

३) शासन निर्णय सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक संकीर्ण-१०२००२/ प्र.क्र.६४/टेक्स-२, दि.२४.२.२००४

प्रस्तावना :

उद्योग, उर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या दि. ३१ मार्च,२००१ च्या शासन निर्णयाद्वारे राज्यात स्थापन होणाऱ्या नवीन लघुऔद्योगिक क्षेत्रातील वस्त्रोद्योग / निटींग / गारमेंट घटकांना बँका / वित्तीय संस्था यांनी मंजूर केलेल्या रोख कर्जावरील (टर्म लोन) ५ टक्के व्याज अनुदान विहित कालावधीकरीता देय केलेले आहे. वस्त्रोद्योग विभागाने त्यांच्या दि.२४.२.२००४ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयाद्वारे यंत्रमाग घटकांसंबंधात व्याप्ती वाढवून ५ टक्के अनुदान देणेसाठी यंत्रमाग घटक नविन असावे अथवा लघु घटक असावे ही अट काढून टाकली आहे. याशिवाय दि.११.२.२००४ च्या शासन निर्णयाद्वारे राज्यातील यंत्रमाग धारकांच्या समस्यांसंबंधात वस्त्रोद्योग विभागाने पॅकेज योजना जाहीर केलेली आहे. सदर योजनेअंतर्गत बँका / वित्तीय संस्था यांच्या थकबाकीदारांसाठी ओ.टी.एस.ची योजना करुन ५० टक्के अनुदान शासनामार्फत देण्यात येणार असून, उर्वरित रकमेच्या व्याजासंबंधात ५ टक्के व्याज अनुदान शासन अनुदान म्हणून देणार आहे. तसेच लघुउद्योग प्रवर्गातील यंत्रमाग घटकांनी बँक / वित्तीय संस्था यांच्याकडून घेतलेल्या रोख कर्ज (टर्म लोन) व खेळते भांडवली कर्ज (वर्कींग कॅपिटल) या दोन्हीवर प्रत्येकी ५% व्याज अनुदान देण्यात येणार आहे. हे निर्णय उद्योग विभागामार्फत जिल्हा उद्योग केंद्रातर्फे राबवावयाचे आहेत. दि.२४.२.२००४ च्या शासन निर्णयाद्वारे जाहीर केलेल्या योजनेअंतर्गत ज्या यंत्रमाग धारकांनी बँक / वित्तीय संस्था यांचेकडून रोख कर्ज (टर्म लोन) घेतलेले आहे, अशा मध्यम आणि मोठ्या यंत्रमाग घटकांना ही ५ टक्के व्याज अनुदान देय होणार आहे. ही योजना उद्योग विभागामार्फत

राबवावयाची आहे. त्याबाबतची मार्गदर्शक तत्वे विहित करण्याबाबतचा प्रस्ताव विचाराधीन होता.

शासन निर्णय :

ज्या यंत्रमाग घटकांनी बँक / वित्तीय संस्थांकडून रोख कर्ज (टर्म लोन)/खेळते भांडवल कर्ज (वर्कींग कॅपिटल) घेतलेले आहे, अशा घटकांना दि.१.४.२००१ पासून ५ वर्षाकरीता ही योजना अंमलात राहील. त्याकरीता खालील मार्गदर्शक तत्वे विहित करण्यात येत आहेत :-

१. बॅंक / वित्तीय संस्था यांचेकडून दि.१.४.२००१ पूर्वी किंवा त्यानंतर घेतलेल्या कर्जासंबंधातील हप्ते / व्याज भरल्याबाबतचे प्रमाणपत्र जिल्हा उद्योग केंद्रात सादर केल्यानंतर ५ टक्के व्याज अनुदान दि.१.४.२००१ पासून देय होईल.

२. सदर यंत्रमाग घटकाने यापुढील मुद्दलाचे व व्याजाचे हप्ते दरवर्षी भरल्याबाबतचे बँक / वित्तीय संस्था यांचे प्रमाणपत्र जिल्हा उद्योग केंद्रात सादर केल्यावर व्याज अनुदान देय राहील.

३. लघुउद्योग घटकासाठी रोख कर्ज (टर्म लोन) / खेळते भांडवल (वर्कींग कॅपिटल) या दोन्हीसाठी असलेली व्याज अनुदान मर्यादा ६ वर्षासाठी प्रत्येक एका यंत्रमाग घटकासाठी रु. २५ लाख एवढी राहील.

४. दिनांक २४.२.२००४ नंतर स्थापन होणाऱ्या मध्यम/मोठ्या यंत्रमाग घटकासाठी रोख कर्जासाठी (टर्म लोन) असलेली व्याज अनुदान मर्यादा ६ वर्षासाठी एका यंत्रमाग घटकासाठी रु.५० लाख एवढी राहील.

५. शासनाने जाहीर केलेल्या वेगवेगळया योजनेअंतर्गत यंत्रमाग उद्योगांना व्याज अनुदान देय केलेले आहे. सर्व प्रकारच्या यंत्रमाग घटकांना खालील शासन निर्णयाद्वारे व्याज अनुदान देय होते.

१) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक आयडीएल-१०२१/सीआर-७३/उद्योग-८, दि.३१ मार्च,२००१.

२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक यंत्रमाग-१०२००३/ प्र.क्र.१५२/टेक्स-३, दि.११ फेब्रुवारी,२००४

३) शासन निर्णय सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक संकीर्ण-१०२००२/प्र.क्र.६४/टेक्स-२, दि.२४ फेब्रूवारी,२००४

४) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक आयडीएल-१००४/ प्र.क्र.९७ (अ)/उद्योग-८, दि. २५ मे,२००४

यंत्रमाग घटकांना व्याज अनुदान देय करण्याबाबत शासनाने जाहीर केलेल्या वरीलपैकी कोठल्याही एकाच योजनेअंतर्गत व्याज अनुदान घेण्यास यंत्रमाग घटक पात्र राहील.

यंत्रमाग धारक घटकामध्ये साधे / सेमीऑटो / ऑटो / जेकॉर्ड / टेरीटॉवेल / शटललेस या सर्व प्रकारचे यंत्रमाग धारक घटकांचा समावेश होईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सु. ज. सोंवितकर)
कक्ष अधिकारी